शासकीय वाहन चालकांना देण्यात येणाऱ्या अतिकालिक भत्त्यामध्ये वाढ.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
**शासन निर्णय क्रमांक : अकाभ-२०२२/प्र.क्र.०७/सेवा-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०७ ऑगस्ट, २०२३.

**पहा :** १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : जीसीएस-१३८०/सीआर-११११/एसईआर-९, दिनांक २६ एप्रिल, १९८२.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : अकाभ-१३९०/सीआर-३४/एसईआर-९, दिनांक १८ ऑक्टोबर, १९९१.
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : अकाभ-१३९३/१०१/सेवा-९, दिनांक २९ मार्च, १९९५.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक : अकाभ-१३९५/१७/सेवा-९, दिनांक ९ नोव्हेंबर, १९९५.
५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : अकाभ-१३०४/प्र.क्र.१८/सेवा-८, दिनांक १६ ऑगस्ट, २००४.
६) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : अकाभ-१३११/प्र.क्र.९/सेवा-६, दिनांक ९ सप्टेंबर, २०११.

## शासन निर्णय

**प्रस्तावना :**

वाहन चालकांना मिळणाऱ्या अतिकालिक भत्त्याच्या कामाच्या वेळेमध्ये व प्रचलित दरामध्ये वाढ करण्याबाबतचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

शासन आता असे आदेश देत आहे की, शासनाचे विविध विभाग व त्याखालील निरनिराळ्या कार्यालयातील वाहन चालकांना ९ तास ४५ मिनिटांपेक्षा जास्त वेळ काम केल्यास खालील शर्तींच्या अधिन राहून रु.१००/- प्रति तास या दराने अतिकालिक भत्ता देण्यात येईल.

१) कामाच्या दिवशी ९ तास ४५मिनिटांपेक्षा जास्त वेळ काम केल्यास (भोजन समय धरुन) आणि रविवार व सुटीच्या दिवशी सुद्धा काम केल्यास दर तासाला रु. १००/- (अर्धा तास किंवा जास्त काम केल्यास तो पूर्ण तास धरण्यात येईल.)

२) वाहन चालकास एका महिन्यात मिळणारी अतिकालिक भत्त्याची एकूण रक्कम त्याच्या एकूण पगाराच्या (Salary) ३०% पेक्षा जास्त असू नये.

२. वाहन चालकांना सुधारित दराप्रमाणे अतिकालिक भत्ता मंजूर करण्याबाबतचे अधिकार पूर्वीप्रमाणेच वाहन चालक ज्यांचे नियंत्रणाखाली काम करतात, त्या विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांना राहतील.

३. हे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

४. सुधारित दराप्रमाणे येणारा खर्च संबंधित विभागाच्या/कार्यालयाच्या त्या त्या लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०८०७१४४४०४७८०५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANITA GOPAL LAD

Digitally signed by ANITA GOPAL LAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ea301388f7ad90c42cd7371a0cf689f51af343e6aa289008e23216a8ab924b97, pseudonym=B77C9E9C928960A1D6B817CA8D38C386AAF197C5, serialNumber=90D52E423E1797301D37FD07F3466E12959376B3BFD39E811A67741F25100F5E, cn=ANITA GOPAL LAD
Date: 2023.08.07 14:57:22 +05'30'

**( अनिता लाड )**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रति,**

१) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२) सर्व सन्माननीय विधानसभा / विधानपरिषद व संसद सदस्य.
३) मा. राज्यपाल यांचे सचिव.
४) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव.
५) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव.
६) सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव.
७) सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग.
८) मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिनस्त विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख.
९) प्रबंधक, मूळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.
१०) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
११) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
१२) महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
१३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
१४) प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई.
१५) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
१६) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
१७) प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
१८) प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई.
१९) मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र, मुंबई.
२०) विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली.
२१) सर्व विभागीय आयुक्त.

२२) सर्व जिल्हाधिकारी.

२३) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.

२४) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.

२५) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई.

२६) सह संचालक, लेखा व कोषागारे, कोकण / पुणे / नाशिक / औरंगाबाद / अमरावती / नागपूर.

२७) संचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई.

२८) सह संचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा, कोकण / पुणे / नाशिक / औरंगाबाद / अमरावती / नागपूर.

२९) वित्त विभागातील सर्व कार्यासने.

३०) निवड नस्ती.